**खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थांमधील व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी प्रवेश घेणाऱ्या आर्थिकदृष्टया मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काच्या प्रतिपूर्तीबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्रशिक्षण विभाग,

शासन निर्णय क्र. जीईसी-२००९/(२०/०९)/तांशि-४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २६ ऑक्टोबर, २००९

**प्रस्तावना:-** शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभाग, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, कृषि विभाग व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय आणि मत्स्यविकास विभाग या विभागांच्या अधिपत्याखाली असणा-या अभ्यासक्रमांच्या खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित संस्थांमध्ये प्रवेश घेणा-या सामाजिक मागास व अर्थिकदृष्टया दुर्बल घटकांतील विद्यार्थी केवळ निधीअभावी व्यावसायिक अभ्यासक्रमांपासून वंचित राहू नयेत म्हणून एक सामाजिक बांधीलकी व घटनात्मक उत्तरदायित्व म्हणून राज्य शासनाने सदर विद्यार्थ्यांची फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शैक्षणिक वर्ष २००६-०७ मध्ये घेतलेला आहे. सदरहू निर्णय शैक्षणिक वर्ष २००७-०८, २००८-०९ मध्ये कायम ठेवण्यात आलेला आहे. या निर्णयानुसार अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशिष्ट मागास प्रवर्ग व इतर मागास प्रवर्ग या समाज घटकांतील विद्यार्थ्यांची फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचे आदेश सामाजिक न्याय विभागामार्फत निर्गमित करण्यात येत आहेत आणि अनुसूचित जमाती या घटकातील विद्यार्थ्यांसाठी फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचा आदेश आदिवासी विकास विभागाकडून निर्गमित करण्यात येत आहे. तसेच आर्थिक दुर्बल घटकांतील विद्यार्थ्यांच्या फी प्रतिपूर्तीबाबतचे आदेश त्या त्या प्रशासकीय विभागामार्फत निर्गमित करण्यात येतात. त्या अनुषंगाने उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिपत्याखालील व्यावसायिक अभ्यासक्रमांस प्रवेश घेणा-या आर्थिक दुर्बल घटकांतील विद्यार्थ्यांची शैक्षणिक वर्ष २००९-१० करिता फी प्रतिपूर्ती करण्याबाबतचे आदेश या विभागाच्या विचाराधीन होते. त्या अनुषंगाने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :** राज्यातील उच्च व तंत्रशिक्षण विभागांतर्गत व्यावसायिक अभ्यासक्रमांच्या खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित महाविद्यालयांत सन २००९-१० या वर्षी प्रवेश घेतलेल्या आर्थिकदृष्टया मागास विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती करण्यासाठी पुढील योजनेस मंजूरी देण्यात येत आहे.

(१) खाजगी विना अनुदानित व कायम विना अनुदानित शिक्षण संस्थांमध्ये पुढील व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी प्रवेश घेणा-या आर्थिकदृष्टया मागास वर्गासाठी सन २००६-२००७,

२००७-२००८ आणि २००८-२००९ या शैक्षणिक वर्षासाठी राबविण्यात आलेली योजना सन २००९-२०१० या चालू शैक्षणिक वर्षात चालू राहील.

| **पदविका** | **पदवी** | **पदव्युत्तर पदवी** |
| --- | --- | --- |
| अभियांत्रिकी | अभियांत्रिकी | एम.बी.ए. |
| औषधनिर्माणशास्त्र | औषधनिर्माणशास्त्र | एम.सी.ए. |
| एच.एम.सी.टी. | एच.एम.सी.टी. | ---- |
| ---- | वास्तूशास्त्र | ---- |

(२) या योजनेचा लाभ वर नमूद केलेल्या पदवी व पदव्युत्तर पदवी या अभ्यासक्रमासाठी शासनाच्या सामायिक परीक्षेद्वारा (CET) प्रवेश घेतलेल्या मागास विद्यार्थ्यांसाठी देय राहील.

(३) सन २००६-०७,२००७-०८ आणि २००८-२००९ या वर्षांमध्ये शासनाने फी प्रतिपूर्तीसंदर्भात घेतलेल्या निर्णयाचा लाभ अभ्यासक्रमाच्या पूर्ण कालावधीसाठी लागू राहील.

(४)ही योजना अभिमत विद्यापीठांना लागू राहणार नाही.

(५) आर्थिकदृष्टया मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना प्रस्तावित शैक्षणिक शुल्काची ५० टक्के दराने प्रतिपूर्ती करण्यात यावी. त्यासाठी वार्षिक उत्पन्नाची अट रु.१,००,०००/- अशी राहील.

(६) शैक्षणिक शुल्क प्रतिपूर्तीचे सदर धोरण हे सन २००९-२०१० या शैक्षणिक वर्षाकरिता लागू राहील.

२. सदर सवलत अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांना लागू राहणार नाही.

३. आर्थिक मागास प्रवर्गाचे प्रमाणपत्र हे संबंधीत तहसीलदार यांचे असावे.

४. आर्थिकदृष्टया मागास विद्यार्थ्यांबाबत सदर योजना चालू ठेवण्यासाठी या विभागाकडून आवश्यक रकमेची तरतुद करण्यात येईल.

५. वर नमूद केलेल्या ३ पदविकांची प्रवेश प्रक्रिया, पदविका प्रवेश नियमानुसार राबविण्यात यावी.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९११०५१७५८१०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भ. सं.वानिखेडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग , मंत्रालय, मुंबई
सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन, मंत्रालय, मुंबई
संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
शालेय शिक्षण विभाग , मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
आयुक्त आदिवासी विकास, नाशिक
अप्पर आयुक्त, आदिवासी विकास ( सर्व )
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेय), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व संबंधित मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, (उ.व तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
कुलगुरु, सर्व विद्यापीठे.
निवडनस्ती/तांशि-१